सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत राज्यातील सर्व शासकीय धान्य गोदामांमध्ये अन्नधान्य साठविण्यासाठी डनेज पॅलेटसची खरेदी गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) पोर्टलद्वारे करणेबाबत...

महाराष्ट्र शासन
अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग
शासन निर्णय क्रमांक: गोदाबां-१०२३/प्र.क्र.२०२/ना.पु.-१६ब
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १५ मार्च, २०२४

वाचा: (१) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक भांखस-२०१४/प्र.क्र.८२ / भाग-III/ उद्योग-४, दिनांक ०१/१२/२०१६.
(२) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक संकिर्ण-२०१६/ प्र.क्र. २१५ /उद्योग-४, दिनांक २४/०८/२०१७.
(३) शासन निर्णय, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, क्रमांक गोदाबां-१०२१/ प्र.क्र.९२/ना.पु.-१६ब, दिनांक ०८/०४/२०२२.

प्रस्तावना:-

राष्ट्रीय अन्न सुरक्षा अधिनियम, २०१३ या कायद्यानुसार प्राधान्य गटातील लाभार्थ्यांना विहित परिमाणानुसार धान्य उपलब्ध करून देणे बंधनकारक आहे. त्यादृष्टीने अन्नधान्याची साठवणूक व हाताळणूक प्रभावीपणे करण्यासाठी सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत शासकीय धान्य गोदामांमध्ये अन्नधान्य साठवणूकीसाठी डनेज पॅलेटसचा वापर प्रायोगिक तत्वावर रायगड व नाशिक जिल्ह्याकरिता संदर्भीय शासन निर्णय क्रमांक ३ अन्वये प्रस्तावित करण्यात आले होते. त्यास अनुसरून सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत राज्यातील सर्व शासकीय धान्य गोदामांमध्ये अन्नधान्य साठविण्यासाठी डनेज पॅलेटसचा वापर करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे.

शासन निर्णय:-

सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत राज्यातील सर्व शासकीय धान्य गोदामांमध्ये अन्नधान्य साठविण्यासाठी डनेज पॅलेटसचा वापर करण्याच्या अनुषंगाने डनेज पॅलेटसची खरेदी करणे आवश्यक आहे. त्यानुषंगाने राज्यातील सर्व शासकीय धान्य गोदामांमध्ये अन्नधान्य साठविण्यासाठी

अंदाजितपणे ३,६५,१८२ डनेज पॅलेट नग (रु.३१३५/- प्रति युनिट) याप्रमाणे रू. ११४,४८,४५,५७०/- (अक्षरी- एकशे चौदा कोटी अठ्ठेचाळीस लाख पंचेचाळीस हजार पाचशे सत्तर रूपये फक्त) इतक्या किमतीचे डनेज पॅलेट खरेदी गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) या केंद्र शासनाच्या पोर्टलवर स्पर्धात्मक ऑनलाईन निविदा प्रक्रियेद्वारे करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

सदर डनेज पॅलेटसच्या खरेदी गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) या केंद्र शासनाच्या पोर्टलवर BOQ पध्दतीने स्पर्धात्मक ऑनलाईन निविदा प्रक्रियेद्वारे करण्यास या आदेशाद्वारे शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

**गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) या पोर्टलद्वारे डनेज पॅलेट खरेदी करण्याची कार्यपद्धती पुढीलप्रमाणे विहित करण्यात येत आहे :-**

**(१) गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) या पोर्टलद्वारे खरेदी प्रक्रिया राबविण्याची जबाबदारी:-**

**१.१** केंद्र शासनाच्या गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) या पोर्टलवर ऑनलाईन निविदा प्रक्रियेद्वारे ही खरेदी करावयाची असल्याने, सदर प्रणालीचा वापर करण्यासाठी खालील नमूद अधिकाऱ्यांना जबाबदार प्राधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) या पोर्टलवरील मार्गदर्शक सूचनांनुसार सर्व बाबींची पुर्तता करणे बंधनकारक आहे.

| अ.क्र. | Role in GeM Portal | Responsibility in GeM Portal | प्राधिकाऱ्याचे नाव व कार्यालय |
|---|---|---|---|
| १. | Primary User | संपूर्ण खरेदी प्रक्रियेचे संनियंत्रण, Secondary User (Buyer) व (Consignee) यांची नोंदणी GeM Portal वर करणे. | उपसचिव / सहसचिव (आस्थापना), अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग. |
| २. | Secondary User (Buyer) | विभागाच्या वतीने डनेज पॅलेट खरेदी करण्याची कार्यवाही करणे. | अवर सचिव (नापु-१६ ब), अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय मुंबई. |

| | | | |
|---|---|---|---|
| ३. | Secondary User (Consignee) | GeM Portal वरुन खरेदी केलेल्या डनेज पॅलेट स्विकृत करणे व त्याची पोहोच देणे. | सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी व अन्नधान्य वितरण अधिकारी |
| ४. | P.A.O./D.D.O. | GeM वरुन खरेदी केलेल्या सामुग्रीची देयके १० दिवसांच्या आत प्रदान करणे | लेखाधिकारी, वित्तीय सल्लागार व उप सचिव कार्यालय. |

**१.२** खरेदी करावयाच्या डनेज पॅलेट या संबंधित जिल्ह्यातील शासकीय धान्य गोदामात पोहोच करणे आवश्यक आहे. संबंधित जिल्हा पुरवठा अधिकारी, त्यांचे पत्ते व त्यांना उपलब्ध करून द्यावयाच्या डनेज पॅलेट संख्या ( मागणीप्रमाणे ) इत्यादी माहिती शासनामार्फत कार्यारंभ आदेशासह उपलब्ध करून देण्यात येईल.

**(२) डनेज पॅलेट ची मानके (Specifications) व खरेदी प्रक्रिया:**

**२.१** खरेदी करावयाच्या डनेज पॅलेटसाठी भारतीय मानक संस्थेकडे नोंदणीकृत चिन्हांकित (आयएसआय मार्क) किंवा आयएसआय मार्कशी समांतर दर्जाधारक उत्पादक / पुरवठादाराकडून निविदा मागविणे आवश्यक आहे. शासनास आवश्यक असणारी डनेज पॅलेट हे **Supply of Dunnage Pallets made from Recycled waste plastic for warehouse application Confirming to IS १६०५८:२०१३ (latest)" SIZE ९०० x ९०० x २५MM thickness** या समान दर्जाचे असणे आवश्यक आहे. या निकषानुसार डनेज पॅलेट खरेदी प्रक्रिया गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) या पोर्टलद्वारे करण्यात येईल.

उक्त निकषानुसार खरेदी करावयाच्या डनेज पॅलेटसाठी NABL यांच्याकडील नोंदणीकृत /प्रमाणीत असलेल्या संस्थेमार्फत आवश्यकता असल्यास Lab Testing करणे आवश्यक आहे. यानुषंगाने सर्व निविदाकारांनी (Bidder) त्यांच्याकडील डनेज पॅलेटचे ( प्रति ५०० ग्रॅम/ १ किलो प्रमाणात ) नमुने Lab Testing साठी निविदा दाखल करतेवळी अवर सचिव (नापु-१६ब),अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, एम-२, पोटमाळा,ॲनेक्स इमारत, मंत्रालय, मुंबई शासनास सादर करणे आवश्यक आहे.

२.२ गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) या पोर्टलवर उपरोक्त निकषानुसार चिन्हांकित (आयएसआय मार्क) किंवा आयएसआय मार्कशी समांतर दर्जा असलेल्या डनेज पॅलेटचे जे पुरवठादार असतील त्यांची सन २०२०-२१,२०२१-२२,२०२२-२३ या मागील लगतच्या ३ आर्थिक वर्षाची सरासरी उलाढाल ही किमान २५ कोटी रुपये आहे. अशा पुरवठादारांकडून निविदा मागविण्यासाठी ई-निविदा प्रसिध्द करावी.

निविदाकारांकडून ई-निविदा (E-Bid) प्राप्त झाल्यावर सहभागी झालेल्या ग्राह्य निविदाकारांकडून ते अधिकृत पुरवठादार असल्यास त्यांना उत्पादक कंपनीने अधिकृत वितरक नेमल्याबाबतचे प्राधिकारपत्र तसेच उत्पादक कंपनी ISO प्रमाणपत्र धारक असल्यास त्याची वैध प्रत, उत्पादक निविदाकार असल्यास त्याच्या ISI व ISO मानकाची वैध प्रत अथवा निविदाकार हा अधिकृत वितरक असल्यास त्यांनी त्यांच्या उत्पादकाच्या ISI मानकाची वैध प्रत ( असल्यास ), तसेच मागील ३ वर्षांची आर्थिक उलाढाल दर्शविणारे प्रमाणित लेखा परिक्षण अहवाल निविदेसह सादर करावेत.

**३) इसारा ( बयाणा ) रक्कम -:**

३.१ खरेदीच्या प्रकारानुसार इसारा रक्कम पुढील प्रमाणे असेल -(रुपये)

| अ.क्र. | निविदेचा प्रकार | खरेदीची एकूण (निविदेची) किंमत | इसारा रक्कम |
|---|---|---|---|
| १ | ३,६५,१८२ (रु.३१३५/- प्रति युनिट) याप्रमाणे रू.११४,४८,४५,५७० -/ एकशे चौदा -अक्षरी) कोटी अठ्ठेचाळीस लाख पंचेचाळीस हजार पाचेश सत्तर रूपये फक्त( | रू. ११४,४८,४५,५७० -/ (अक्षरी- एकशे चौदा कोटी अठ्ठेचाळीस लाख पंचेचाळीस हजार पाचेश सत्तर रूपये फक्त) | रू. १,१४,४८,४५५/- |

**३.२** इसाऱ्याची रक्कम गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) कार्यप्रणालीमध्ये विहित केल्यानुसार जमा करावी.

**३.३** ज्यांनी इसारा रक्कम भरलेली असेल, त्यांना ऑनलाईन खरेदी प्रक्रियेमध्ये भाग घेणे बंधनकारक आहे, खरेदी प्रक्रियेमध्ये भाग न घेतल्यास त्यांची इसाऱ्याची संपूर्ण रक्कम जप्त करण्यात यावी.

३.४ विनिर्दिष्टीत केलेल्या इसारा रक्कमेपेक्षा कमी रक्कम भरणाऱ्या पुरवठादारास अपात्र ठरवून भरलेली संपूर्ण रक्कम जप्त करण्यात यावी.

३.५ गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) या पोर्टलद्वारे पुरवठादार निश्चित झाल्यावर न्यूनतम पुरवठादारा व्यतिरिक्त उर्वरित सर्व पुरवठादारांची इसारा रक्कम पोर्टलवरील तरतुदीनुसार परत करण्यात यावी.

३.६ शासकीय मंडळ /महामंडळ/उपक्रमांना तसेच सुक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांतर्गत वरील वस्तुंसाठी नोंदणीकृत असलेल्या उत्पादक व पुरवठादार यांना निविदेमध्ये निविदा शुल्क व बयाना रक्कम भरण्यापासुन सुट देण्यात यावी. यामध्ये महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ / महासंघ हे वगळता इतर नोंदणीकृत पुरवठादारांना उत्पादकाकडून अधिकृत विक्रेता असल्याचे प्राधिकार पत्र सादर करणे आवश्यक राहील अथवा गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) या पोर्टलवरील तरतुदीनुसार कार्यवाही करावी.

(४) Lab Testing Charges:-

डनेज पॅलेट तपासणीसाठी प्रति निविदाकाराने आवश्यक असणारे रू.२०,०००/- इतके तपासणी शुल्क तसेच त्यांच्याकडील १ डनेज पॅलेट नमुना Lab Testing साठी Government e Marketplace (GEM) या पोर्टलवर प्रकाशीत निविदेत नमूद विहीत कालावधीत अवर सचिव (नापु-१६ब), अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, एम-२, पोटमाळा, ॲनेक्स इमारत, मंत्रालय, मुंबई यांच्याकडे सादर करणे आवश्यक आहे. सदर तपासणीसाठी प्रति निविदाकाराने आवश्यक तपासणी शुल्क वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे नावे जमा करून त्याची पोहच पावतीची छायांकित प्रत शासनास सादर करणे आवश्यक आहे.

(५) **निविदा शुल्क** (Tender Fees )

पुरवठादारास उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या दि. १ डिसेंबर, २०१६ रोजीच्या शासन निर्णयासोबतच्या नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्र.३.१.२.१ व त्यानुषंगाने नमूद परिशिष्ट-८ मधील तरतूदीनुसार प्रस्तुत डनेज पॅलेट खरेदी निविदेची निविदा शुल्क (Tender Fees ) रक्कम **रू.३०,०००** इतकी रक्कम धनाकर्षाद्वारे तसेच गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) या पोर्टलवरील तरतुदीनुसार

वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचेकडे जमा जमा करून त्याची छायांकित प्रत शासनास सादर करावी लागेल.

**(६) अनामत रक्कम (Security Deposit):-**

६.१ पुरवठादारास उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या दि. १ डिसेंबर, २०१६ रोजीच्या शासन निर्णयासोबतच्या नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्र.४.६ मधील तरतूदीनुसार खरेदी मुल्याच्या ३% अनामत रक्कम करारनाम्यासोबत धनाकर्षाद्वारे तसेच गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) या पोर्टलवरील तरतुदीनुसार वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचेकडे जमा करून त्याची छायांकित प्रत शासनास सादर करावी लागेल.

६.२ अनामत रकमेवर कोणतेही व्याज देय राहणार नाही. तसेच, पुरवठादाराने करारातील कोणत्याही अटीचा भंग केल्यास अनामत रक्कम जप्त करण्यात येईल व त्याचे नाव काळ्या यादीत टाकण्यात येईल.

**(७) पुरवठा कालावधी :**

यशस्वी पुरवठादारास पुरवठा आदेश मिळाल्यापासून ९० कार्यालयीन दिवसांच्या कालावधीत डनेज पॅलेटसचा पुरवठा संबंधित जिल्हा पुरवठा कार्यालयांना स्वत:च्या खर्चाने करावयाचा आहे.

**(८) पुरवठादार व खरेदीदारांची जबाबदारी:-**

८.१ जर पुरवठादार हा उत्पादक कंपनीचा अधिकृत वितरक असेल तर, त्यास सदर प्रक्रियेत त्याबाबतचे प्राधिकारपत्र सादर करावे लागेल.

८.२ उपरोक्त परिच्छेद (२) मध्ये नमुद केलेल्या मानकानुसार चिन्हांकित (आयएसआय मार्क) किंवा आयएसआय मार्कशी समांतर दर्जा असलेल्या डनेज पॅलेटसचा पुरवठा करणे आवश्यक आहे.

८.३ डनेज पॅलेट खराब / तुट असल्याचे आढळून आल्यास त्यास पुरवठादार स्वत: जबाबदार राहील. खराब डनेज पॅलेटस बदलून न दिल्यास अथवा तुट भरुन न दिल्यास त्याची रक्कम अदा करावयाच्या देयकातून कपात करुन घेण्यात येईल.

८.४ पुरवठादाराने डिलीव्हरी दिल्यानंतर, डिलीव्हरी चलनावर डनेज पॅलेटस ताब्यात घेणाऱ्या गोदामपाल/ गोदाम व्यवस्थापक यांच्या सही शिक्क्यानंतर डिलीव्हरी चलनावर जिल्हा पुरवठा अधिकारी/ सहाय्यक जिल्हा पुरवठा अधिकारी/ अन्नधान्य वितरण अधिकारी यांनी प्रति स्वाक्षरी करुन शिक्का मारावा. संबंधित गोदामपाल/गोदाम व्यवस्थापक यांनी डनेज पॅलेटस उचित दर्जाचे असल्याबाबत खातरजमा करुन **परिशिष्ट-अ** मध्ये विहित केल्यानूसार प्रमाणपत्र द्यावे.

८.५ उपरोक्त ८.४ प्रमाणे कार्यवाही केल्यानंतर जिल्हा पुरवठा अधिकारी / अन्नधान्य वितरण अधिकारी यांनी गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) या पोर्टलवर वस्तु प्राप्त झाल्याबाबतची आवश्यक ती नोंद करावी. त्यानंतर देयक प्रदानासाठीची गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) पोर्टलवरील मुदत विचारात घेऊन, लेखाधिकारी, वित्तीय सल्लागार व उप सचिव कार्यालय यांनी देयके अदा करावीत.

८.६ गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) या पोर्टलवरील कार्यपद्धतीनुसार GeM पोर्टलवर निविदा निश्चित झाल्यानंतर यशस्वी निविदाकारास अटी व शर्तीसह online contract पाठविण्यात येत असल्याने यशस्वी पुरवठादारासोबत वेगळ्याने करारनामा करण्याची आवश्यकता नाही.

**(९) पुरवठ्यास विलंब झाल्यास करावयाची कार्यवाही :-**

९.१ विलंब शुल्काच्या आकारणीबाबत भांडार खरेदी नियमावलीच्या दिनांक १ डिसेंबर, २०१६ च्या शासन निर्णयातील परिशिष्ट-४(अ) मध्ये दर्शविल्यानुसार मालाची किंमत रु. २ लाखापेक्षा जास्त नसल्यास प्रती हप्ता विलंबास ½ टक्के विलंब शुल्क व कमाल मर्यादा १० टक्क्यांच्या मर्यादेत विलंब शुल्काची आकारणी करण्याची तरतूद आहे. तसेच मालाची किंमत रु. २ लाखापेक्षा जास्त असल्यास प्रती हप्ता विलंबास ½ टक्के विलंब शुल्क व कमाल मर्यादा ५ टक्क्यांच्या मर्यादेत विलंब शुल्काची आकारणी करण्याची तरतूद आहे. पुरवठयास विलंब झाल्यास सदर तरतूदीनुसार पुरवठादाराच्या देयकातून विलंब शुल्क वसूल करण्यात येईल.

**(१०) online contract मधील तरतूदीसंदर्भात वाद विवाद व अपिल:-**

online contract मधील अटी व शर्तीसंदर्भात तसेच दंड, वसूली इ. संदर्भात पुरवठादार निर्णय दिल्याच्या दिनांकापासून ३० दिवसात शासनाकडे कडे दाद मागू शकेल. शासनाने दिलेला

निर्णय अंतिम राहील आणि तो दोन्ही पक्षांना बंधनकारक राहील. पुरवठादार online contract संपल्यानंतर जास्तीत जास्त ६ महिन्यात त्यातील तरतूदीसंदर्भात दाद मागू शकेल.

**(११) सदर निविदा रद्द करण्याचे किंवा स्विकारण्याचे अंतिम अधिकार शासनाकडे राहतील.**

**(१२)** या कामी येणारा खर्च हा अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाच्या वित्तीय सल्लागार व उप सचिव, महाराष्ट्र शासन यांचे वैयक्तिक ठेव लेख्यामधून मागणी क्रमांक एम-४, "४४०८ अन्न साठवणूक व वखार साठवणूक व वखार साठवण यावरील भांडवली खर्च, मुख्य लेखाशिर्ष (०२)(१०) राष्ट्रीय अन्न सुरक्षा योजनेखालील मुंबई शहर अन्नधान्य खरेदीवरील अनुषंगिक खर्च (अनिवार्य), ४४०८ ०३२६, या लेखाशिर्षा खाली खर्ची टाकण्यात यावा.

तथापि केंद्र शासनाने दि.२७ मे २०२२ व दि. ३१ मे २०२२ च्या पत्रानुसार राष्ट्रीय अन्न सुरक्षा योजना ही म्हणून घोषित केलेली आहे. त्यानुषंगाने विभागाने राष्ट्रीय अन्न सुरक्षा योजनेकरीता ICICI बँकेत SNA खाते कार्यान्वित केलेले असून माहे ऑगस्ट २०२३ पासून राष्ट्रीय अन्न सुरक्षा योजनेचे सर्व अनुषंगिक खर्चाचे प्रदाने SNA खात्यातुन करण्यात येत आहे. सबब डनेज पॅलेटसाठी येणारा खर्च ICICI मुंबई फोर्ट खाते क्र. ६२३५०११८०२९० IFSC Code ICICI ०००६२५ या SNA खात्यातून करणे आवश्यक आहे. सदरचा सन २०२३-२०२४ व पुढील आर्थिक वर्षात उपलब्ध होणाऱ्या तरतुदीतून भागविणे आवश्यक आहे.

(१३) सदर शासन निर्णय अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाच्या शासन निर्णय क्रमांक र्वका-१०९८/ ५६७/प्र.क्र.२३३८/ना.पु.-१२, दिनांक ३०/११/१९९८ वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील बाग-२, उपविभाग-४, अ.क्र. १५ प्रमाणे प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या शक्तींचा वापर करून निर्गमित करण्यात येत आहे.

(१४) सदर शासन निर्णयास वित्त विभाग, अनौपचारीक संदर्भ क्र. १७८७/ दि.०६.०३.२०२४ अन्वये वित्त विभागाने मान्यता दिलेली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२४०३१५२२५९२५३७०६ असा आहे. हा

शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIKAS
MOHAN RAUT

Digitally signed by VIKAS MOHAN RAUT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLIES AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, 2.5.4.20=2257bfd8267146a9a0f6fe86e455cfabd6b353b41a3dcde19df1c89749d0de4d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=65D403E0F9767CEEA21CB169A8A5475E77BE535DEEEF3CF5809A87BF3A020F2F, cn=VIKAS MOHAN RAUT
Date: 2024.03.15 23:09:33 +05'30'

(विकास राऊत)
शासनाचे अवर सचिव

प्रति,

१) मा. मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे खाजगी सचिव
२) मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा / विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३) प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४) विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मंत्रालय, मुंबई
५) सर्व विभागीय आयुक्त
६) सर्व उप आयुक्त (पुरवठा)
७) सर्व जिल्हाधिकारी
८) सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी/ सर्व अन्नधान्य वितरण अधिकारी
९) वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई
१०) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
११) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
१२) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर
१३) निवड नस्ती / ना.पु.-१६ब